शासकीय सेवेत असताना दिवंगत, अकाली सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या नातेवाईकांस अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्रमांक अकंपा- 1097/प्र.क्र. 32/आठ,

मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 8 सप्टेंबर 1997.

वाचा :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक अकंपा-1095/प्र.क्र. 34-अ/आठ, दिनांक 23 ऑगस्ट 1996.

**शासन निर्णय** :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक अकंपा--1095/प्र.क्र. 34-अ/आठ, दिनांक 23 ऑगस्ट 1996 नुसार लिपिक-टंकलेखक पदावर अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती करिता टंकलेखनाचे विहित वेगमर्यादेचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्यास दोन वर्षांची मुदत देण्यात आलेली आहे. काही उमेदवारांना टंकलेखनाचे विहित वेगमर्यादेचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र दोन वर्षांच्या मुदतीत प्राप्त करुन घेणे शक्य होत नाही. अशा उमेदवारांची नियुक्ती, टंकलेखनाचे विहित वेगमर्यादेचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र उपरोक्त मुदतीत प्राप्त न केल्याने संपुष्टात आणण्यात येते.

2. लिपिक--टंकलेखक पदावरील नियुक्ती टंकलेखनाच्या वेगमर्यादेच्या प्रमाणपत्राअभावी संपुष्टात आणण्यात आलेल्या उमेदवारांच्या कुटुंबास आर्थिक हलाखीत रहावे लागू नये या उद्देशाने त्यांचा गट "ड" मधील पदासाठी विचार करावा काय याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत असा निर्णय घेण्यात आलेला आहे की, "जे लिपिक--टंकलेखक नियुक्तीनंतर टंकलेखनाची विहित वेग मर्यादेची परीक्षा पास होऊ शकले नाहीत म्हणून त्यांच्या सेवा संपुष्टात आणल्या आहेत, अशा उमेदवारांचा गट "ड" मधील नियुक्तीसाठी पदांची उपलब्धता विचारात घेऊन नव्याने नियुक्ती देण्याबाबत विचार करण्यात यावा. मात्र अशा रीतीने गट 'ड" मधील पदावर नियुक्ती स्वीकारल्यानंतर कुठल्याही परिस्थितीत गट "क" मधील पदासाठी त्याचा विचार करता येणार नाही, ही बाब त्यांना नियुक्तीपूर्वी स्पष्ट करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

य. मा. जोशी,
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,

(कृ.मा.प.

मगु--रोटा--साप्रवि--एच--984(1000--9--97)